**संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीवरील अध्यक्ष व अशासकीय सदस्यांच्या नेमणुका रद्द करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: समिती-२०२०/प्र.क्र.०२/विसयो**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १२ मार्च, २०२०

**वाचा:-** शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-विसयो-२०१८/प्र.क्र.६२ विसयो, दि. २०/०८/२०१९

**शासन परिपत्रक:-**

विशेष सहाय्य कार्यक्रमांतर्गत राज्यात राबविण्यात येणा-या विविध योजनांचा लाभ पात्र लाभार्थ्यांना मिळण्याकरिता मंजूरी देण्याकरिता संदर्भाधीन शासन निर्णयान्वये संजय गांधी निराधार अनुदान योजना समित्या गठीत करण्यात आलेल्या आहेत. या समित्यांवरील अध्यक्ष तसेच अशासकीय सदस्यांच्या नेमणुका संबंधित जिल्हयांच्या पालकमंत्र्यांच्या शिफारशीनुसार जिल्हाधिका-यांमार्फत करण्यात येतात. अशाप्रकारे नियुक्त करण्यात आलेल्या सर्व अध्यक्ष व अशासकीय सदस्यांच्या नेमणुका रद्द करण्यात येत आहेत. सर्व संबंधितांना जिल्हाधिका-यांनी अवगत करावे.

नवीन पालकमंत्र्यांकडून शिफारशी प्राप्त होऊन नवनियुक्त अध्यक्ष व अशासकीय सदस्य यांच्या समित्या गठीत होईपर्यंतच्या कालावधीत संदर्भाधीन शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या तहसिलदार यांच्या अध्यक्षतेखालील समित्या कार्यरत राहतील. या समित्यांमार्फत आवश्यकतेनुसार दरमहिन्याला बैठक आयोजित करुन या योजनेंतर्गत प्राप्त झालेल्या अर्जांवर योग्य ती कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००३१३११०६१२३६२२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY GIRIDHAR PATIL

Digitally signed by SANJAY GIRIDHAR PATIL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0f7d1eee7567d430eefd928eefa78ed2a6072c4ce8f3c0aa4efaf26d9c32daeb, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=bd10fe5a55495bc381e7b4d4b658250c74eb3f55113a21fd21c8620f04c2c257, ou=SOCIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY GIRIDHAR PATIL
Date: 2020.03.13 11:09:00 +05'30'

**( सं. गि. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२) मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव
४) सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
६) सर्व विभागीय आयुक्त.
७) सर्व जिल्हाधिकारी.
८) निवड नस्ती.